जून-जुलै, २०२० मध्ये झालेल्या नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित झालेल्यां नागरिकांना मदत वाटप करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत (अमरावती विभाग).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस - २०२०/प्र.क्र.२१५ /म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.५.२०१५
२) विभागीय आयुक्त,अमरावती यांचे पत्र क्रमांक: उपआ/पुनर्व/उपले/कावि-५९/२०२०, दिनांक ६.८.२०२०

प्रस्तावना:

अमरावती विभागात जुन-जुलै, २०२० मध्ये झालेल्या विविध नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये बाधित झालेल्या व्यक्तींना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार मदत वाटप करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव विभागीय आयुक्त,अमरावती यांचेकडून संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला आहे. सदर प्रस्तावानुसार निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक १३.८.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये मंजूर करण्यात आलेला आहे. त्यानुसार बाधित व्यक्तींना मदत देण्यासाठी विभागीय आयुक्त,अमरावती यांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

अमरावती विभागात जून-जुलै, २०२० मध्ये झालेल्या विविध नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये बाधित झालेल्यांना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयातील निकष व दरानुसार मदत वाटप करण्यासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रानुसार मागणी केल्याप्रमाणे रूपये १८५.१७ लक्ष (रूपये एक कोटी पंचाऐंशी लक्ष सतरा हजार फक्त) इतका निधी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून त्यांना खालीलप्रमाणे लेखाशीर्षनिहाय मंजूर करण्यात येत आहे.

| बाब | लेखाशीर्ष | वितरीत करावयाचा निधी (रू लाखात) |
|---|---|---|
| मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना सहाय्य | २२४५ ०१५५ | १००.०० |
| मृत पशुधनासाठी सहाय्य | २२४५ ०३१५ | १४.३६ |
| घर पडझडीसाठी सहाय्य | २२४५ ०२७१ | ७०.८१ |
| **एकूण** | | **१८५.१७** |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्तांना कार्यासन म-११ यांनी वितरित करावा.

२. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. त्यानंतरच रक्कम आहरित करून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा.

४. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

५. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे, इत्यादी अंतर्गत वरील विवरणपत्रात दर्शविलेल्या उप/गौण शिर्षाखाली निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १८१/व्यय-९/२०२०, दिनांक २४.८.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००८२४१४१०५७३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.08.24 14:18:02 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
२. विभागीय आयुक्त,अमरावती,
३. जिल्हाधिकारी, अमरावती/अकोला/यवतमाळ/बुलढाणा,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
६. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/अकोला/यवतमाळ/बुलढाणा,
८. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
९. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१०. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
११. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).